**पशुसंवर्धन विभागामार्फत सन २०१७ ते २०१९ या ३ वर्षांच्या कालावधीमध्ये ५० कोटी वृक्ष लागवड, संगोपन आणि देखभाल या कार्यक्रमांतर्गत दिलेल्या उद्दिष्टासंदर्भात वर्षनिहाय नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करुन त्याची अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण २०१६/प्र.क्र.१२०/पदुम ४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१६.

वाचा :- १. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१५ / प्र.क्र.१३१/ फ-११, दि. ३१.०३.२०१६.
२. शासन परिपत्रक कृषि व पदुम विभाग, क्रमांक-संकीर्ण २०१६/प्र.क्र.१२० /पदुम ४, दि.३.०६.२०१६
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११,दिनांक १०.१०.२०१६

**परिपत्रक -**

जागतिक तापमानातील वाढ, हवामान आणि ऋतू बदल याची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्त्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. ह्या उपक्रमाचा भाग म्हणून वाचा-१ येथे नमूद शासन निर्णयान्वये दि. १ जुलै, २०१६ रोजी राज्यात एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी आणि धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. या कार्यक्रमामध्ये शासनाचे सर्व विभाग सहभागी झाले होते. या अनुषंगाने पशुसंवर्धन विभागांतर्गत क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सविस्तर सूचना संदर्भ क्र. २ येथे नमूद शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या.

२. त्याचबरोबर दि. १ जुलै, २०१६ च्या कार्यक्रमामध्ये शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, एन. एस. एस., एन. सी. सी., स्काऊट ॲन्ड गाईडस्, अशासकीय संस्था, स्वयंसेवी संस्था, सामाजिक क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या संस्था, औद्योगिक समूह, सीएसआर, लोकप्रतिनिधी, गृहनिर्माण संस्था, सहकारी संस्था, शासकीय कर्मचारी व अधिकारी इत्यादींचा देखील सहभाग संबंधित विभागांनी घेतला होता.

३. लोकांच्या स्वयंस्फूर्त सहभागामूळे २ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट सहजगत्या पूर्ण झाले. दि. १ जुलै रोजी एकंदर २.८२ कोटी वृक्ष लागवड करण्यात आली. हा कार्यक्रम लोकचळवळीमध्ये रूपांतरीत करण्यास शासनास चांगले यश प्राप्त झाले आहे. मा. पंतप्रधान महोदयांनी दि. ३१ जुलै, २०१६ रोजीच्या मन की बात या रेडिओवरून प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमामध्ये वन विभागामार्फत राबविण्यात आलेल्या २ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत अभिनंदन केलेले आहे. त्याचबरोबर यापुढील वर्षांमध्ये हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाबाबत देखील सूतोवाच केलेले आहे. त्याशिवाय, निरनिराळया धर्मग्रंथामध्ये नमूद वृक्ष लागवडीचे महत्त्व विशद केलेले आहे. त्यानुसार वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सातत्य ठेवण्याबाबत मा. पंतप्रधान महोदयांनी आवाहन केलेले आहे.

४. त्याचप्रमाणे लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड या संस्थेने या अभिनव उपक्रमाची नोंद घेऊन राज्य शासनास प्रमाणपत्र प्रदान केलेले आहे.

५. ब्राझील मधील रिओ दि जानेरो येथे दि. ६ ऑगस्ट, २०१६ रोजी ऑलम्पिक सोहळयाचे उदघाटन अत्यंत दिमाखदारपणे संपन्न झाले. या जागतिक सोहळ्यात विविध २०५ देश सहभागी झालेले होते. भारतीय खेळाडू देखील मोठ्या संख्येने यात सहभागी झाले होते. या दिवशी वृक्षलागवडीचे महत्त्व, पर्यावरणाचे रक्षण आणि जागतिक तापमानात होणाऱ्या वाढीची तीव्रता कमी करणे (Mitigation of Global Warming) इत्यादी संदर्भातील महत्त्व विशद करणाऱ्या संदेशांचे दमदार सादरीकरण झाले. त्यानंतर ऑलंम्पिक २०१६ या स्पर्धेची सुरूवात करण्यात आली. यावेळी दिलेले संदेश पुढीलप्रमाणे:-

**पृथ्वीचा होत असलेल्या हानीला थांबविणे पुरेशे नाही, तर पृथ्वीला पर्यावरण ऱ्हासाच्या संकटापासून वाचविण्याची वेळ आली आहे. वृक्ष लावा, पृथ्वीला वाचवा हा ऑलंम्पिकचा संदेश आहे.**

**पृथ्वीचा ऱ्हास होण्यापासून वाचविण्याची वेळ आली आहे. त्यासाठी पृथ्वीवर होणारे आक्रमण नुसतेच थांबवायचे नाही, तर पूर्णपणे थांबवायचे आहे. चला, एकत्र येऊन पृथ्वी वाचवूया. आपण प्रत्येकाने एक रोपटे लावण्याचा संकल्प करूया.**

ऑलंम्पिक उदघाटनाच्यावेळी सहभागी प्रत्येक खेळाडूकडून एक बीज लावून घेण्यात आले. सायकल रॅलीमध्ये वृक्षारोपणाचे महत्त्व व पृथ्वीला वाचविण्याचा संदेश देणारा फलक होता. ध्वजवाहकाच्या समोर चालणाऱ्या प्रत्येक मुलाच्या हातामध्ये छोटी रोपे देण्यात आली होती.

६. वर नमूद पार्श्वभूमीवर वृक्षारोपणाची गती तुटू न देता ती पुढे सुरू ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. त्या अनुषंगाने पुढील ०३ वर्षामध्ये ५० कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने शासनाने वाचा-३ येथील महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेले आहे. त्याचबरोबर ५० कोटी वृक्षारोपणाच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. सन २०१६ मध्ये वन विभाग व इतर विभागांसाठी अनुक्रमे ७५ टक्के व २५ टक्के वृक्षारोपणाचे उद्दिष्ट दिलेले होते. याच धर्तीवर पुढील २०१७ ते २०१९ या तीन वर्षासाठी उद्दिष्ट निश्चित करण्यात आलेले आहे. याशिवाय ग्रामपंचायतींना त्याच प्रमाणात एकंदर पुढील ३ वर्षांमध्ये १२ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट देण्यात आलेले आहे. त्याचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| अ. क्र. | वर्ष | प्रस्तावित कालावधी | वन विभाग | पशुसंवर्धन विभाग | ग्रामपंचायती | एकूण उद्दीष्ट |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | सन २०१७ | १५ जून ते ०७ जुलै,२०१८ * | २.२५ कोटी | ७५ लक्ष | १ कोटी | ४ कोटी |
| २ | सन २०१८ | १५ जून ते ०७ जुलै,२०१८ * | ७.५० कोटी | २.५० कोटी | ३ कोटी | १३ कोटी |
| ३ | सन २०१९ | १५ जून ते ०७ जुलै, २०१९ * | १८.७५ कोटी | ६.२५ कोटी | ८ कोटी | ३३ कोटी |
| | | **एकूण** | २८.५० कोटी | ९.५० कोटी | १२ कोटी | ५० कोटी |
| | | | **एकूण ३८ कोटी** | | **एकंदर ५० कोटी** | |

**(* राज्यातील निरनिराळ्या विभागामध्ये पावसाची सुरूवात आणि आवक सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळ्या वेळी होते. त्यामुळे त्या त्या वर्षाच्या पावसाचा अंदाज घेवून विभागनिहाय आणि जिल्हानिहाय दिलेली उद्दिष्टे पूर्ण करण्याबाबत त्या त्या वर्षात परिस्थितीनुसार लवचिकता (Flexibility) ठेवण्यात येईल.)**

७. दि. १ जुलै, २०१६ रोजी झालेल्या वृक्षारोपणामध्ये पशुसंवर्धन विभागासह इतर २० विभाग सहभागी झालेले होते. पुढील तीन वर्षांच्या कालावधीत जवळपास सर्वच ३३ शासकीय विभाग ( संसदीय कार्य विभाग वगळून ) व त्यांच्या अधिपत्याखालील निम शासकीय मंडळे आणि महामंडळे यांचा समावेश या कार्यक्रमात करण्यात आला आहे. त्यानुसार संपूर्ण शासन यंत्रणेस या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमात समाविष्ट करून घेण्याचा मानस आहे. प्रत्येक विभाग आणि त्या अंतर्गत मंडळे / महामंडळे यांच्या करिता वर नमूद केल्याप्रमाणे उद्दिष्टे निश्चित करताना, जिथे वृक्ष लागवडीस अधिक वाव आहे, ती महत्तम क्षमता विचारात घेतली आहे. त्यानुसार पशुसंवर्धन विभागास वाचा-३ येथील शासन निर्णयासोबतच्या, **विवरणपत्र क्रमांक ३** मध्ये नमूद आणि मा. मुख्य सचिव आणि मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेनुसार खालीलप्रमाणे उद्दिष्ट आणि वृक्षरोपणाची संभाव्य स्थळे निश्चित करुन देण्यात आलेली आहेत.

**सन २०१७, २०१८ व २०१९ या पुढील ३ वर्षात विविध विभागांना एकंदर ९.५० कोटी वृक्षारोपणाच्या उद्दिष्टांतर्गत पशुसंवर्धन विभागास वाटप करण्यात आलेले वर्षनिहाय उद्दीष्ट.**

| वृक्षरोपणांची रोपणासाठी संभाव्य स्थळे | वृक्षारोपणाचे वर्षनिहाय उद्दीष्ट | | |
|---|---|---|---|
| | **सन - २०१७** | **सन - २०१८** | **सन - २०१९** |
| १) पशुसंवर्धन आयुक्तालय, औंध पुणे.<br>२) रोग अन्वेषण विभाग औंध पुणे.<br>३) पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था औंध पुणे.<br>४) पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ मर्यादीत पुणे, यांच्या अधिनस्त विविध प्रक्षेत्रे.<br>५) महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ अकोला अधिनस्त विविध प्रक्षेत्रे, वळू संगोपन केंद्रे व गोठीत रेत प्रयोगशाळा.<br>६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान नागपूर अंतर्गत सर्व महाविद्यालये, प्रक्षेत्रे व विविध संशोधन संस्था.<br>७) लोकर विश्लेषण प्रयोगशाळा, गोखलेनगर, पुणे.<br>८) राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र गोखलेनगर, पुणे. | ७५ लाख | २.५ कोटी | ६.२५ कोटी |

| | | | |
|---|---|---|---|
| ९) गुणविश्लेषण प्रयोगशाळा आरे कॉलनी गोरगांव, पूर्व.<br>१०) अंडी उबवणी केंद्र पुणे, नागपूर, औरंगाबाद, कोल्हापूर व बदक पैदास केंद्र, गडचिरोली.<br>११) सघन कुक्कुट विकास प्रकल्प, सर्व.<br>१२) प्रत्येक जिल्हा पशुवैद्यकीय सर्व चिकित्सालय, तालुका लघुपशुवैद्यकीय सर्व चिकित्सालय, पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१, व पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ परिसर | | | |

८. महसूल व वन विभागाच्या दि. १० ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यक्रमाचा सुक्ष्म आराखडा तयार करणे, त्या त्या वर्षातील वृक्ष लागवडीसाठी अक्षांश व रेखांशासह स्थळ निश्चिती करणे, निकषाप्रमाणे खड्डे तयार करणे, जुन-जूलै मधील वृक्ष लागवड, वृक्ष लागवडीचा प्रत्यक्षदर्शी अहवाल (Real Time Reporting) आणि अंतिमत: संगोपन या विषयी सदर शासन निर्णयात विहित केलेल्या कार्यपध्दतीप्रमाणे दिलेल्या कालमर्यादेत कार्यवाही करावी. तसेच याबाबतची माहिती वाचा-२ येथील शासन निर्णयातील **विवरणपत्र-१ आणि २** मध्ये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर व सचिव (वने) यांना पाठवून त्याची प्रत या विभागास सादर करावी.

९. वृक्षारोपणाचा दृश्य परिणाम दिसून येण्यासाठी, संवर्धन, पाणीपुरवठा, जनावरांपासून रोपांचे संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे / प्लॅस्टीक कुंपण, कायम स्वरुपी देखभाल, निगा, जोपासना व संगोपन इत्यादी कामांचा नियोजन आराखडा तयार करावा व त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी. तसेच, या वृक्षाचे जिवंत राहण्याचे प्रमाण (Survival Rate) किमान ८०% ते ९०% राहणेबाबत देखील काळजी घेण्यात यावी.

१०. या कार्यक्रमांतर्गत होणारा खर्च मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच, आवश्यक तेथे सी.एस.आर. फंडातून तरतूद उपलब्ध करुन घ्यावी. जिथे निधीची अडचण असेल त्या ठिकाणी वन व सामजिक वनीकरण विभागामार्फत मोफत रोपे देण्याचा प्रयत्न केला जाईल. त्याबाबतची आवश्यक ती नोंद आणि लेखा इत्यादीबाबत रोपे उपलब्ध करुन घेणारा विभाग आणि रोपे उपलब्ध करुन देणारा विभाग अशा दोनही विभागांमार्फत ठेवण्यात यावी. तसेच, ह्याबाबतची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर, सचिव (वने) आणि पशुसंवर्धन विभागास पाठविण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०११३५७५२४६०१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11a06bf85893554ac5cded657c0f1435af29a0ad118fb759493176e40002b178, cn=Shashank Madhav Sathe
Date: 2016.12.01 14:01:32 +05'30'

**( श. मा. साठे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (पदुम) यांचे स्वीय सहायक
४. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे स्वीय सहायक
५. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
६. सचिव (वने) महसूल व वन विभाग.
७. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई ३२
८. वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१५), मंत्रालय, मुंबई ३२
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण ) महाराष्ट्र राज्य पुणे
११. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य औंध पुणे ०७
१२. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सेमीनरी हिल्स, नागपूर.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ अकोला
१४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी मेंढी व शेळी विकास महामंडळ गोखलेनगर पुणे.
१५. सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे ०७
१६. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था औंध, पुणे ०७
१७. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
१८. विभागीय व्यवस्थापक, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे, नागपूर व औरंगाबाद (हर्सुल)
१९. पशुसंवर्धन उपायुक्त, गुण विश्लेषण प्रयोगशाळा, आरे कॉलनी, गोरेगांव, मुंबई.
२०. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (सर्व)
२१. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२२. सहायक आयुक्त पशुसंवर्धन, मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, पुणे, औरंगाबाद, कोल्हापूर व नागपूर.
२३. सहायक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय (सर्व)
२४. महसूल व वन विभाग (फ-११), मंत्रालय मुंबई ३२
२५. निवडनस्ती पदुम ४.